महाराष्ट्र शासन

गृह विभाग (विशेष),

परिपत्रक क्र. सीसीआर ५३८८/सीआर-७७७/विशा-५,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

दिनांक: ११ जानेवारी १९९०.

परिपत्रक :- शासन परिपत्रक क्र. सीसीआर ५३८४/३१५७/विशा-५, दिनांक ३० ऑक्टोबर १९८४. याद्वारे शासनाने फिरत्या चित्रपटगृहांना एका जागी ५ वेळे कार्यरत राहण्यास मुभा देता येईल असे कळविले होते. या आदेशात सुधारणा करून शासन असे आदेश देत आहे की, महाराष्ट्र चित्रपटगृहे (विनियमन) नियम, १९६६ मधील संबंधित तरतुदींचे वेळोवेळी यथोचित पालन केले जाईल या शर्तीवर, फिरत्या चित्रपटगृहांना एकाच ठिकाणी दहा आठवड्यांच्या कालावधीसाठी कार्यरत राहण्यास शासन परवानगी देत आहे.

महाराष्ट्र राज्यपालांच्या आदेशानुसार व नांवाने,

कक्ष अधिकारी, गृह विभाग (विशेष), महाराष्ट्र शासन.

..........

प्रति,

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,

पोलीस आयुक्त, मुंबई/ठाणे/पुणे/नागपूर.

सर्व विभागीय आयुक्त,

सर्व जिल्हाधिकारी (५ जादा प्रतींसह).

........

महाराष्ट्र शासन
परिपत्रक क्रमांक बीसीआर-५३८८/सीएम-७७७/विशा-५,
गृह विभाग [विशेष], मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक: २१ मार्च १९९७.

परिपत्रक :- शासन परिपत्रक क्रमांक बीसीआर-५३८८/सीएम-७७७/विशा-५, दिनांक ११.१.९० अन्वये महाराष्ट्र चित्रपटगृहे [विनियमन] नियम, १९६६ मधील संबंधीत तरतुदींचे वेळोवेळी यथोचित पालन केले जाईल व या अटीवर, फिरत्या चित्रपटगृहांना एकाच ठिकाणी दहा वर्षापर्यन्तच्या कालावधीसाठी कार्यरत राहण्यास परवानगी देण्यात आलेली आहे. या १० वर्षाच्या कालावधीमध्ये फिरते चित्रपटगृह काही दिवस बंद असेल तर तो कालावधी वगळावा किंवा कसे तसेच १० वर्षाचा कालावधी हा चित्रपटगृहाच्या जागेसाठीही आहे किंवा कसे या प्रश्न वारंवार शासनाकडे उपस्थित करण्यात येत आहे, त्यामुळे याबाबत शासन आता पुन: स्पष्ट करीत आहे की, १० वर्षाच्या कालावधीची गणना करतांना १० वर्षाच्या कालावधी मध्ये फिरते चित्रपटगृह कोणत्याही कारणामुळे काही दिवस बंद असेल तर तो कालावधी वगळण्यात येवू नये. तसेच फिरत्या चित्रपटगृहाला एका जागी १० वर्षे पूर्ण झाल्यानंतर पुन: त्याच ठिकाणी त्याच जागेवर कोणत्याही फिरत्या चित्रपटगृहाला परवानगी देण्यात येवू नये.

महाराष्ट्राचे ~~xxxxxx~~ राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

भोसले

[ अ. ना. भोसले ]
कार्यासन अधिकारी, गृह विभाग [विशेष]
महाराष्ट्र शासन.

प्रति,

महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
सर्व पोलीस आयुक्त,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हादंडाधिकारी.